नागपूर उड्डाण क्लब प्रा.लि., नागपूर यांना
सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एनएफसी-१००८/प्र.क्र.६७८/०८/२८-अ,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :** (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एनएफसी-१००३/ प्र.क्र.९/२००३/२८-अ, दिनांक २१ डिसेंबर, २००६,

(२) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्र. एनएफसी/कावि-१७५/२००९, दिनांक १६ सप्टेंबर, २००९ चे पत्र,

(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एनएफसी-१००७/ प्र.क्र.२०६/०७/२८-अ, दिनांक १३ नोव्हेंबर, २००९.

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दिनांक २१ डिसेंबर, २००६ अन्वये नागपूर उड्डाण क्लब, नागपूर पुनरुज्जीवित करण्यात आला आहे. नागपूर उड्डाण क्लबची कंपनी कायद्यानुसार दिनांक ०६ मार्च, २००७ रोजी नोंदणी करण्यात आली असून, सदर क्लब नागपूर फ्लाईंग क्लब प्रा.लि., नागपूर या नावाने नोंदविण्यात आला आहे. सदर उड्डाण क्लबसाठी सुरुवातीचे भागभांडवल म्हणून रुपये २.५० कोटी उभारण्यास आणि सदर उड्डाण क्लब आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होईपर्यंत क्लबचे कामकाज सुरु राहण्यासाठी शासनाकडून सुरुवातीच्या तीन वर्षासाठी आर्थिक मदत करण्याचा निर्णय शासनाने घेतला होता. सदरहू मुदत सन २००८-०९ मध्ये संपलेली आहे. नागपूर उड्डाण क्लब प्रा.लि. साठी सन २००९-१० या वित्तीय वर्षात वेतन व वेतनेतर बाबींसाठी रुपये ९४२० हजार अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली असून सदर अर्थसहाय्य मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. नागपूर उड्डाण क्लब प्रा.लि., नागपूर करिता चालू आर्थिक वर्षी शासन मान्य बाबींसाठी रुपये ४,५०० हजार (रुपये पंचेचाळीस लक्ष फक्त) सहाय्यक अनुदान मंजूर / वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ विभागीय आयुक्त, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी आणि उपायुक्त (सा.प्र.), नागपूर विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. याप्रित्यर्थचा खर्च चालू आर्थिक वर्षी मागणी क्रमांक ए-७, ३०५३, नागरी विमानचालन ८० सर्वसाधारण, ००३, प्रशिक्षण (००) (०१) नागपूर उड्डाण क्लबसाठी सहाय्यक अनुदान (३०५३००१२) या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. खर्चाचा मासिक प्रगती अहवाल शासन व महालेखापाल यांना सादर करावा.

५.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने सदर विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७५३/०९/व्यय-४, दिनांक १०.१२.२००९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक 201003221423200l असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अंविअंभिरे

**( अं. वि. अंभिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर तथा अध्यक्ष, नागपूर उड्डाण क्लब प्रा.लि., नागपूर,
२) विभागीय उपायुक्त (सा.प्र.), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता आणि लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग, कार्यासन अर्थसंकल्प १४/व्यय-४, मंत्रालय, मुंबई,
८) कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन २५, मंत्रालय, मुंबई,
९) निवड नस्ती.